**शासकीय महिला राज्यगृह, जालना या संस्थेसाठी इमारत भाडे अदा करण्यास मंजुरी देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**

**महिला व बाल विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण २०२२/ प्र.क्र. ३१/का-२**

नवीन प्रशासकीय इमारत, ३ रा मजला,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक ०२ मार्च, २०२२ .

वाचा :- १. शासन निर्णय क्रमांक २०१६/प्रक्र.१४३/का-२, दिनांक ७ जुलै,२०१६.
२. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५
३. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक १४ ऑक्टोबर २०२१
४. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे यांचे पत्र क्रमांक मबाविआ/मवि/ शाशांमवि /इमारत भाडे प्रस्ताव/का-६/२०२१-२२/१३, दिनांक ०३.०१.२०२२

**प्रस्तावना** :-

महिला व बाल विकास विभागांतर्गत महिला व बालकांच्या विकासाकरीता राबविण्यात येत असलेल्या विविध विकास योजनेखाली शासकीय महिला राज्यगृह, जालना ही संस्था कार्यरत असून या संस्थेच्या जागेकरीता शासकीय इमारत उपलब्ध नसल्याने सदर संस्था खाजगी इमारतीमध्ये भाडे तत्वावर घेण्यात आलेल्या जागेमध्ये चालविण्यात येत आहे. सदर संस्थेने यापूर्वी भाड्याने घेण्यात आलेल्या डॉ. एस. एस. मिसळ यांच्या भाडेतत्वावरील इमारतीच्या करारनाम्यानुसार दि. ०१.०८.२०१७ ते दि. ३१.०८.२०२० या कालावधीकरिता दरमहा रु. ६८,७२५/- इतक्या दराने भाडे आकारणीचा करार केला होता. या करारनाम्याची मुदत संपुष्टात आल्याचे कळविले होते. त्यास अनुसरून जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, जालना यांनी शासकीय महिला राज्यगृह, जालना या संस्थेस सौ. स्वाती संजय काळबांडे व ॲड. श्री संजय संपतराव काळबांडे यांचे मालकीच्या सिटी सर्व्हे क्र. ४७८, सीटीएस नं. ११३९६/२०२/२०३, या प्लॉटवर संपूर्ण आरसीसी बांधकाम असलेली इमारत बांधकाम परवाना क्र. एपीएल ०१०३८ दि. २९.०७.२०२० हि अयोध्या नगर, अंबड रोड, जालना येथील जागा भाडे तत्वावर घेण्यास परवानगी दिलेली असून सदरहू नवीन इमारतीत स्थलांतरीत होण्याच्या सूचना संस्थेस दिल्या होत्या. तसेच सार्वजनिक बांधकाम विभाग, जालना यांनी उपरोक्त नवीन इमारतीचा तळ मजला ६.५० चौ. मी., पहिला मजला १४३.१६ चौ. मी., दुसरा मजला ३१६.७१ चौ. मी. एकूण क्षेत्रफळ ४६६.३७ चौ. मी., मोकळी जागा १५०.०० चौ. मी. असलेल्या खाजगी इमारतीसाठी दरमहा रु. ९७,६६५/- इतके भाडे मंजूर केले असल्याने शासकीय महिला राज्यगृह, जालना या संस्थेच्या संबंधित नवीन इमारतीच्या मालकांबरोबर दि. ०१.१०.२०२० ते ३०.०९.२०२३ या तीन वर्षांच्या कालावधीकरीता नव्याने भाडे करार करण्यात आला आहे.

वित्त विभागाच्या उपरोक्त वाचा क्र. २ च्या शासन निर्णयान्वये मुंबई, नवी मुंबई, ठाणे, पुणे, पिंपरी-चिंचवड, नागपूर, औरंगाबाद येथील कार्यालयीन इमारती वगळता अन्य प्रदेशातील प्रत्येक कार्यालयीन इमारतीसाठी प्रतिमहा रु. ५०,०००/- पर्यंत भाडे मंजूरीचे अधिकार विभाग प्रमुख यांना देण्यात आले असून त्या रकमेवरील असणाऱ्या भाड्याच्या रक्कमेस मंजूरीचे पूर्ण अधिकार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आले असल्याने शासकीय महिला राज्यगृह, जालना या संस्थेच्या जागेकरीता करण्यात आलेल्या नवीन इमारत भाडे करारास मान्यता देण्याचा प्रस्ताव महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांनी सादर केला असल्याने सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या मान्यतेस्तव विचाराधीन होती. त्यामुळे प्रस्तुत प्रकरणी खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

शासकीय महिला राज्यगृह, जालना या संस्थेकरीता डॉ. एस. एस. मिसाळ यांच्या मालकीच्या इमारतीमध्ये भाड्याने जागा घेतली असून इमारत मालकासोबत दि. ०१.०८.२०१७ ते दि. ३१.०८.२०२० या कालावधीकरिता दरमहा रु. ६८,७२५/- इतक्या दराने भाडे आकारणीचा करार केला होता. संस्थेने इमारत मालकासोबत केलेला भाडेकरार संपुष्टात आला आहे. जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, जालना यांनी शासकीय महिला राज्यगृह, जालना या संस्थेस सौ. स्वाती संजय काळबांडे व ॲड. श्री संजय संपतराव काळबांडे यांचे मालकीच्या सिटी सर्व्हे क्र. ४७८, सीटीएस नं. ११३९६/२०२/२०३, अयोध्या नगर, अंबड रोड, जालना येथे असलेल्या इमारतीमध्ये स्थलांतर करण्यास परवानगी दिली असून इमारत मालकासोबत दिनांक ०१.१०.२०२० ते ३०.०९.२०२३ या तीन वर्षांच्या कालावधीकरीता भाडे करार करण्यात आला आहे. तसेच कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, जालना यांनी सदर संस्थेकरीता ४६६.३७ चौ. मी. इतक्या क्षेत्रफळाकरीता शासकीय दराने दरमहा रु. ९७,६६५/- इतके भाडे मंजूर करण्यात आले आहे.

शासकीय महिला राज्यगृह, जालना या संस्थेच्या जागेकरीता इमारत मालकासोबत दि. ०१.१०.२०२० ते दि. ३०.०९.२०२३ या कालावधीकरिता दरमहा रु. ६८,७२५/- इतके भाडे आकारणीचा करार करण्यात आला आहे. या सुधारित घरभाडे प्रस्तावास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

शासकीय महिला राज्यगृह, जालना या संस्थेने सौ. स्वाती संजय काळबांडे व ॲड. श्री संजय संपतराव काळबांडे यांचे मालकीच्या सिटी सर्व्हे क्र. ४७८, सीटीएस नं. ११३९६/२०२/२०३, अयोध्या नगर, अंबड रोड, जालना येथे असलेल्या इमारतीच्या भाड्यापोटी दरमहा रु. ९७,६६५/- याप्रमाणे होणारा खर्च हा लेखाशिर्ष २२३५ १२५४ (योजनेत्तर) या लेखाशिर्षाखाली भाडेपट्टी व कर या उद्दिष्टसाठी उपलब्ध तरतुदीतून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आला आहे. सदर शासन निर्णायकरीता संकेतांक क्रमांक २०२२०३०२१०५९१८६६३० असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by JAHANGIR KYAMUDDIN KHAN
Date: 2022.03.02 11:01:21 +05'30'

**( जहांगीर खान )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा. मंत्री / मा. राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. अध्यक्ष / उपाध्यक्ष (विधानसभा),विधानमंडळ, मुंबई.
३. मा. सभापती / उपसभापती (विधानपरिषद),विधानमंडळ, मुंबई.
४. प्रधान सचिव, महिला व बाल विकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
५. आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. उप आयुक्त, (महिला विकास), महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. महालेखापाल १ / २ (लेखा व अनुज्ञेयता ) /(लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
८. विभागीय उप आयुक्त, महिला व बाल विकास (सर्व)
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०. निवासी लेखापिरक्षा अधिकारी, मुंबई.

११. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे.
१२. जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी,रायगड.
१३. अधिक्षक, शासकीय महिला राज्यगृह, जालना.
१४. सह सचिव /उप सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१५. कक्ष अधिकारी(का-४) महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१६. निवड नस्ती (का-२), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.